शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून राज्यात विद्यमान विनाअनुदानित अभ्यासक्रमाच्या संस्थेत कायम विनाअनुदानित तत्वावर पदविका वास्तुशास्त्र अभ्यासक्रम सुरु करणे यासाठी वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांच्या परवानगीस अनुसरुन मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र. 787391 -HTED-14025/11/2024-MHT(TE-5)**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.

दिनांक:- ११ जुलै, २०२४.

**संदर्भ** :-१) वास्तुकला परिषद यांचे पत्र क्रमांक :CA/५/Academic-२०२४/MAH, दिनांक ३१.०५.२०२४.

२) वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांचे Council of Architecture (Minimum Standards of Architectural Education) Guidelines for Diploma Courses, २०२२, दिनांक : १७.६.२०२२.

३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक १०/ आर्किटेक्चर/सीओए मान्यता/२०२४-२५/२३५, दिनांक ०४.०६.२०२४.

**प्रस्तावना :-**

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) या वास्तुकला अभ्यासक्रमाच्या सर्वोच्च प्राधिकरणाने, शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून पदविका आर्किटेक्चर अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता दिलेल्या राज्यातील संस्थांची यादी तसेच मान्यतेचे पत्र तंत्रशिक्षण संचालनालयास दि.३१.०५.२०२४ च्या पत्रान्वये उपलब्ध करुन दिलेले आहे.

२. शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पर्यंत वास्तुशास्त्र अभ्यासक्रमांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्यामार्फत मान्यता दिली जात होती व वास्तुकला परिषदेची मान्यता ऐच्छिक होती. शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासुन वास्तु कला शाखेतील पदविका / पदवी तसेच पदव्युत्तर पदवी या अभ्यासक्रमांची मान्यता वास्तुकला परिषद,नवी दिल्ली यांचेकडुन घेणे अनिवार्य केले आहे. वास्तुकला परिषद यांनी त्यांच्या दिनांक १७.६.२०२२ च्या पत्रान्वये वास्तुशास्त्र पदविका अभ्यासक्रमाबाबत मार्गदर्शक सूचना त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केल्या आहेत. यामध्ये अभ्यासक्रमाचा कालावधी, पात्रता, परीक्षा पध्दत, कर्मचारी, साधन सामुग्री, अभ्यासक्रम याबाबतची मानके व प्रमाणके नमूद केलेली आहेत.

३. शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून राज्यात विद्यमान विनाअनुदानित अभ्यासक्रमाच्या संस्थेत विनाअनुदानित तत्वावर पदविका वास्तुशास्त्र अभ्यासक्रम सुरु करणे यासाठी वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांनी दिलेल्या परवानगीस अनुसरून शासन मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी दि.०४.०६.२०२४ च्या पत्राद्वारे शासनास सादर केलेला आहे.

**शासन निर्णय :-**

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) या वास्तुकला अभ्यासक्रमाच्या सर्वोच्च प्राधिकरणाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून व तंत्रशिक्षण संचलनालयाने प्रस्तावित केल्यानुसार शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून राज्यात विद्यमान विनाअनुदानित वास्तुकला अभ्यासक्रमाच्या संस्थेत विनाअनुदानित तत्वावर Annexure A मध्ये नमुद ०६ संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आल्यानुसार नवीन पदविका वास्तुशास्त्र अभ्यासक्रम सुरु करणेबाबत खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती -**

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत बाबतीत वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) ने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

३. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता विवरणपत्रातील त्यांच्या नावासमोर नमूद केल्याप्रमाणे मर्यादित राहील.

४. शासनाने विहित केलेल्या तसेच वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) ने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

५. सदर पदविका अभ्यासक्रमांसाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची संलग्नता घेणे आवश्यक आहे.

६. प्रस्तुत बाबतीत वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांनी वेळोवेळी विहित केलेल्या अटी व महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांनी वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सर्व बाबींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

७. अभ्यासक्रमांची शुल्क निश्चिती शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ शासनाने वेळोवेळी निर्देशीत केलेल्या प्राधिकरणामार्फत विहीत करण्यात येईल.

८. सदर अभ्यासक्रमांच्या मुदतवाढीस वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांची मान्यता घेण्याची कार्यवाही संस्थेने नियमाप्रमाणे करावी.

९. वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांच्या मानकाप्रमाणे सर्व सोयी सुविधा पुर्ण करुन देण्यास संस्था पुर्णपणे जबाबदार राहील असे हमीपत्र संबंधित संस्थाप्रमुखांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे सादर करावयाचे आहे. त्यानंतरच सदर संस्थांना अभ्यासक्रम सुरू करण्यासाठी संचालनालयाने संमती द्यावयाची आहे.

१०. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ते प्रक्रिया शुल्क व संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

११. सदर व्यावसायीक पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार/पद्धतीनुसार करण्यात येतील.

१२. शुल्क नियामक प्राधिकरण/ शासनाने वेळोवेळी निर्देशीत केलेल्या प्राधिकरणामार्फत विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

१३. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१४. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वास्तुकला परिषद, नवी दिल्ली (Council of Architecture) यांच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१५.सदर संस्था, संचालक, तंत्रशिक्षण यांच्या नियंत्रणाखाली राहिल व संबंधित अभ्यासक्रमांच्या परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रे, मुंबई यांच्याकडून घेतल्या जातील.

१६.रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

१७.अभ्यासक्रमात बदल झाल्यामुळे / अभ्यासक्रम बंद झाल्यामुळे भविष्यात जी काही परिस्थीती उद्भवते त्यास संबंधित संस्था जबाबदार राहतील. याप्रमाणे तसे हमीपत्र संबंधित संस्थांनी द्यावयाचे आहे.

१८. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१९.ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे विहीत नोंदणी शुल्क अदा केलेले नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ते वसूल करावे. या शासन मान्यतेनुसार नवीन अभ्यासक्रमांचा / वाढीव प्रवेश क्षमतेचा समावेश शैक्षणिक वर्ष २०२४-२५ च्या प्रवेश प्रक्रियेत करण्याची कार्यवाही संचालक, तंत्रशिक्षण यांनी त्वरीत करावी.

२. शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी दहावी नंतरच्या प्रथम वर्ष अभियांत्रिकी पदविका अभ्यासक्रमाच्या फेरीमध्ये सदर Annexure-A मधील संस्थांतील डिप्लोमा इन आर्किटेक्चर , डिप्लोमा इन इंटेरियर डिझाईन, डिप्लोमा इन आर्किटेक्चर अँण्ड इंटेरियर डिझाईन , डिप्लोमा इन इंटेरियर डिझाईन अँण्ड डेकोरेशन व डिप्लोमा इन आर्किटेक्चरल असिस्टंटशिप या अभ्यासक्रमांचा समावेश करुन वास्तुकला परिषद,नवी दिल्ली यांनी निर्धारित केलेल्या "No candidate shall be admitted to Diploma program unless she/he has passed an examination at the end of the 10th Std. or its equivalent Examination." पात्रतेनुसार सदर अभ्यासक्रमांची प्रवेशप्रक्रिया राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१११८०४३५६२०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJAY VITTHAL KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2024.07.11 18:16:01 +05'30'

**(अजय खर्डे)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.
३. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
५. सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
६. सर्व संबंधित संस्था, (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
७. अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११० ००१,
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली,

९. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल रिसर्च बिल्डींग,नँशनल इन्स्टिटट्युट ऑफ इंडस्ट्रियल इंजिनिअरिंग (एनआयटीआयई) कँम्पस,विहार लेक पवई, मुंबई - ४०० ०८७,

१०.निवड नस्ती/तांशि-५.

**Annexure-A**

**List of Institutes Approved by Council of Architecture for conduction of Diploma Courses in the state of Maharashtra from A.Y.2024-25**

| SN. | DTE Code | COA Code | Name and Address of Institution | Name of Course | Duration | Intake Sanctioned |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 6533 | MH10-D2 | Marathwada Mitra Mandal's College of Architecture 302-A, Deccan Gymkhana, Off. F.C.Road , Nr.Gokhale Institute, PUNE-411 004 (Maharashtra) | Diploma in Interior Design | 3-year | 40 |
| 2 | _ | MH19-D | Bharati Vidyapeeth University's College of Architecture Dhankawadi Campus, Off Pune-Satara Road, Katraj, PUNE-411 043 (Maharashtra) | Diploma in Architecture | 3-year | 40 |
| 3 | 3439 | MH55-D | School of Architecture, Anjuman-I-Islam's Kalsekar Technical Campus, Plot No 2 & 3, Sector-16, Khanda Gaon, Near Thana Naka, New Panvel, Navi Mumbai-410206, Maharashtra | Diploma in Architecture | 3-year | 40 |
| 4 | 3478 | MH77-D | C.T.E.S. College of Architecture, C/o. N.G. Acharya & D.K. Marathe College, N.G. Acharya Marg, Chembur, Mumbai-400071. | Diploma in Architectural Assistantship | 3-year | 40 |
| 5 | 6896 | MH91-D | Shri Shivaji Maratha Society, College of Architecture, Sno. 74/1-A, 74/1-B, Araneshwar, Parvati Pune, Near SBI Bank, Pune-411009, Maharashtra | Diploma in Architecture and Interior Design | 3-year | 40 |
| 6 | 3484 | MH94-D | Smt.K.L. Tiwari College of Architecture, Survey No. 268/1 & 268/2, RIS Building ,Kanakia Park, Mira Road East, District Thane, Maharashtra-401105. | Diploma in Architecture | 3-year | 40 |

AJAY VITTHAL
KHARDE

Digitally signed by AJAY VITTHAL KHARDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=99f2d58601919f488f4e4b4238bd3f1def13cbf3ed7d870c3ce707f566424ec3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C51AE2EF70E8CB85FD2CAD9AA28A46DC972A1A9B3FEB81BAAB9A648B45BE1B24, cn=AJAY VITTHAL KHARDE
Date: 2024.07.11 18:16:17 +05'30'